# महाराष्ट्र शासन

**क्रमांक: देयक-२०२३/प्र.क.३८/१३-अे**
**कृषि व पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय व**
**मत्स्यव्यवसाय विभाग**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक:- ०३ मार्च,२०२३

**विषय:- उप विभागीय कृषि अधिकारी, नागपूर यांचे अधिनस्त शासकीय रोपवाटिका कदीमबाग, जि.नागपूर या प्रक्षेत्राचे सन २०२१-२२ चे २१-सामुग्री व पुरवठा रु.६,००,१४५/-च्या देयकास प्रशासकीय मंजूरी मिळण्याबाबत.**

संदर्भ:- १) वित्त विभाग, शासन निर्णय, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३२०/२०१३/ विनियम,दिनांक १७/४/२०१२५
२) कृषी आयुक्तालयाचे पत्र क्र.कृषि/लेखा-१/आस्था/देयक/ मजूरी/नागपूर/७१६३/२०२३, दि.२४/०२/२०२३.

**ज्ञापन :**

उप विभागीय कृषि अधिकारी, नागपूर यांचे अधिनस्त शासकीय रोपवाटिका कदीमबाग, जि.नागपूर या प्रक्षेत्राचे सन २०२१-२२ चे २१-सामुग्री व पुरवठा रु.६,००,१४५/- (अक्षरी रुपये सहा लाख एकशे पंचेचाळीस फक्त) अदा करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. वित्त विभाग, शासन निर्णय, दिनांक १७/४/२०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-पहिला, उपविभाग-१ अनुक्रमांक-६, नियम ४० नुसार प्रशासनिक विभाग प्रमुख यांना पूर्ण अधिकार प्रदान करण्यात आलेले आहेत. त्या अधिकारानुसार सदर ज्ञापन निर्गमित करण्यात येत आहे.

३. यावरील येणारा खर्च मागणी क्र.डी-३, २४०१-पिकसंवर्धन, (०३) रोपमळे (०३) (०१) भाजीपाला रोपमळे, फळ रोपमळे व स्थानिक उद्याने (२४०१ १७२२) अंतर्गत २१-सामुग्री व पुरवठा या बाबीखाली सन २०२२-२३ करिता उपलब्ध असलेल्या निधीतून भागविण्यात यावा.

४. आहरण व संवितरण अधिकारी यांनी सदर निधी ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आला आहे त्याच प्रयोजनासाठी वापरण्यात येईल, याची दक्षता घ्यावी. तसेच या प्रकरणी कोणतीही प्रशासकीय व वित्तीय अनियमितता होणार नाही याची दक्षता घ्यावी, तसे, आढळल्यास याबाबतची जबाबदारी सर्व संबंधितावर राहील.

सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक २०२३०३०३१६१६०३०१०१ असा आहे. हे ज्ञापन डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्र राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

HEMANT GORAKHNATH MHAPANKAR

Digitally signed by HEMANT GORAKHNATH MHAPANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=1775f5c28a439e88c4c15ab3f88d6a6beb26ad2675a8c7a7ff397b2e5305303d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6756123D309547BB1E152A6AEB6042BDE4040836DF541FD3620CA87FF8E71CC5, cn=HEMANT GORAKHNATH MHAPANKAR
Date: 2023.03.03 16:19:53 +05'30'

**( हे. गो. म्हापणकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. आयुक्त (कृषी) कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. संचालक ( कृषी प्रक्रिया व नियोज), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. विभागीय कृषी संहसंचालक, नगापूर विभाग, नागपूर.
४. उप विभागीय कृषी अधिकारी, नागपूर.
५. महालेखापाल-१/२( लेखा व अनुज्ञेयता ) मुंबई/ नागपूर
६. महालेखापाल-१/२( लेखा परिक्षा ) मुंबई / नागपूर
७. वरिष्ठ जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.
८. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
९. सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन,५ वा मजला, मुंबई-३२.
१०. निवडनस्ती/१३ अे.